राज्यातील नागरी/ ग्रामीण बिगर शेती सहकारी पतसंस्थांच्या स्थिरीकरण व तरलता सहाय्य निधी योजनेसाठी अर्थसहाय्य.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- सीसीआर-११२३/प्र.क्र. ३६९/७-स**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- ०१ जुलै, २०२४

**प्रस्तावना:-**

राज्यात सुमारे २०,००० बिगर शेती सहकारी पतसंस्था कार्यरत असून या संस्थांमध्ये सुमारे २.६७ कोटी ठेवीदारांच्या सुमारे ९०,००० कोटी ठेवी आहेत. या संस्थांच्या कामकाजाचे प्रभावीपणे नियमन करण्यासाठी तसेच या संस्थांमधील ठेवींना संरक्षण देण्यासाठी सन २०१७ मध्ये सहकार कायद्यात बिगर कृषी सहकारी पतसंस्थांसाठी प्रकरण क्र. ११-१अ समाविष्ट करण्यात आले आहे. या प्रकरणातील कलम १४४-१३अ अन्वये नियामक मंडळ गठीत करण्याची तरतूद आहे. तसेच कलम १४४-२५अ मध्ये स्थिरीकरण व तरलता सहाय्य निधी निर्माण करण्याची तरतूद करण्यात आली आहे. या तरतुदीमध्ये सदर निधी उभारण्यासाठी वेगवेगळया स्त्रोतांचा समावेश असून त्यामध्ये शासनाकडून मिळालेले कोणतेही अर्थसहाय्य याचा देखील समावेश आहे. त्यानुषंगाने सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी राज्यातील बिगर शेती सहकारी पतसंस्थांच्या स्थिरीकरण व तरलता सहाय्य निधी योजनेबाबत सादर केलेल्या प्रस्तावास मा. मंत्री (सहकार) यांनी दिनांक ०८.१२.२०२३ रोजी मान्यता दिली आहे. सदर योजनेनुसार राज्यातील बिगर शेती सहकारी पतसंस्थांकडून प्रत्येक वर्षी प्रती रु. १०० ठेवीसाठी १० पैसे याप्रमाणे स्थिरीकरण व तरलता सहाय्य निधीमध्ये अंशदान जमा होणार आहे.

वरील योजनेनुसार ठेवीदारांच्या रु. १,००,०००/- पर्यंतच्या ठेवींना संरक्षण देण्याच्या दृष्टीने जमा होणा-या अंशदान निधीतून अवसायनात जाणा-या बिगर शेती सहकारी पतसंस्थांच्या ठेवीदारांची रक्कम परत करण्यात येणार आहे. यासंदर्भात सहकार आयुक्त व निबंधक, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या नियामक मंडळाच्या स्तरावर उभारण्यात येणा-या स्थिरीकरण व तरलता सहाय्य निधीसाठी रु. १०० कोटी इतके शासकीय अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यातील नागरी / ग्रामीण बिगर शेती सहकारी पतसंस्थासाठी स्थिरीकरण व तरलता सहाय्य निधी योजनेसाठी रु. १०० कोटी इतका निधी परतफेडीच्या अटीवर बिनव्याजी भांडवल स्वरुपात या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात येत आहे.

राज्य शासनामार्फत सदर अर्थसहाय्य सहकार कायद्यातील तरतुदीनुसार सहकार आयुक्त व निबंधक, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या नियामक मंडळाच्या स्तरावर निर्माण करण्यात आलेल्या स्थिरीकरण व तरलता सहाय्य निधीमध्ये जमा करण्यास मान्यता देण्यात येत आहे. नियामक मंडळाने सदर अर्थसहाय्याची परतफेड सन २०२६-२७ या आर्थिक वर्षापासून प्रत्येक वर्षी १० टक्के या प्रमाणात करावयाची आहे.

नियामक मंडळास द्यावयाचे अर्थसहाय्य ही विभागाची नवीन योजना असल्यामुळे या योजनेसाठी नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने तसेच मा. प्रधान महालेखाकार, मुंबई यांच्या मान्यतेने लेखाशीर्ष निश्चित करण्याबाबत स्वतंत्रपणे आदेश निर्गमित करण्यात येतील.

सदरचा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ५११/का.१४३१/, दि.२३/१२/२०२३ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २२४/२०२४/ व्यय-२, दि. १८/०३/२०२४ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७०१११११२१५६८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANOOP KUMAR IAS

Digitally signed by ANOOP KUMAR IAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILES DEPARTMENT, 2.5.4.20=257f78acf3ca20d9e91d7a73a76aa0240463e4aafdd4d13de68918dc20bad8e6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1C2EE608849BDB812849B6C8878F95607059B530FF717C8E39C09D06B394E02B, cn=ANOOP KUMAR IAS
Date: 2024.07.01 11:24:58 +05'30'

**( अनुप कुमार )**
**अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव.
३. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव.
४. मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
५. मा. विधानसभा सदस्य / विधान परिषद सदस्य (सर्व)
६. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव.
७. मा. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग.
८. मा. प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग.
९. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
११. जिल्हा उपनिबंधक / जिल्हा विशेष लेखापरिक्षक, सहकारी संस्था (सर्व)
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३. महालेखापाल (लेखा व परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४. संचालक, लेखा व कोषागार, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१६. निवड नस्ती.